**वन विभागातील वनोपजाची विक्री ई-ऑक्शनद्वारे करण्याकरीता मे.स्पर्श टेक्नॉलॉजी, पुणे यांना Authorised Sevice Provider (ASP) म्हणून मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१०४/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०२०

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, पत्र क्र.एमएफपी-२०१२/प्र.क्र.१/फ-९, दिनांक ०७.११.२०१५

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१६/ए-२/एएसपी/प्र.क्र.५३/भाग-४/जी-३३९/२०-२१, दिनांक २१.०८.२०२०

**प्रस्तावना :-**

वन विभागातील वनोपजाची विक्री ई-ऑक्शनद्वारे करण्यासाठी BOOT Model वर आधारीत Authorised Sevice Provider (ASP) ची नियुक्ती प्रथमत: तीन वर्षाच्या कालावधीकरिता करण्याबाबत संदर्भाधिन दिनांक ०७.११.२०१५ च्या पत्रान्वये मंजूरी देण्यात आली होती. हा कालावधी ५ वर्षा पर्यंत वाढवता येईल अशी तरतूद होती. त्यानुसार प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी मे.स्पर्श टेक्नॉलॉजी, पुणे यांची दिनांक ०१.१२.२०१५ ते ३०.११.२०१८ या तीन वर्षाच्या कालावधीकरीता नेमणुक केली होती. त्यानंतर दिनांक ३०.११.२०२० पर्यंत ई-ऑक्शन पध्दतीची पूर्ण अंमलबजावणी करण्याकरीता मे.स्पर्श टेक्नॉलॉजी, पुणे यांची मुदतवाढीने नेमणुक करण्यात आली होती.

वन विभागातील वनोपदाची विक्री ई-ऑक्शनद्वारे करण्याकरीता मे.स्पर्श टेक्नॉलॉजी, पुणे यांची Authorised Sevice Provider (ASP) म्हणून मुदत दिनांक ३०.११.२०२० रोजी संपत आहे. त्यानंतर मे.स्पर्श टेक्नॉलॉजी, पुणे यांची सेवा चालू ठेवावी किंवा कसे, याबाबत निर्णय घेण्यासाठी प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), नागपूर यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने दिनांक १४.०८.२०२० रोजीच्या बैठकीत मे.स्पर्श टेक्नॉलॉजी, पुणे यांना एक वर्षाकरीता मुदतवाढ देण्यास सहमती दर्शविली आहे. त्यानुसार मे.स्पर्श टेक्नॉलॉजी, पुणे यांच्या सोबतच्या करारास एका वर्षाकरीता मुदतवाढ देण्याबाबत संदर्भाधिन दिनांक २१.०८.२०२० च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासन मान्यता प्रदान करण्याची विनंती केलेली आहे. त्यानुसार महा-ई ऑक्शन पोर्टलचे GRAS प्रणालीसोबत एकत्रीकरण करण्यासाठी एक वर्षाचा कालावधी लागणार असल्याने मे.स्पर्श टेक्नॉलॉजी, पुणे यांच्यासोबतच्या करारास एका वर्षाकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वनोपजाच्या विक्रीबाबत ई-ऑक्शन पध्दती लागू करण्यासाठी महा-ई-ऑक्शन पोर्टलद्वारे विकसीत करण्यात आलेली कार्य प्रणाली समाधानकारकरित्या चालू ठेवण्याकरीता BOOT model वर आधारित **मे.स्पर्श टेक्नॉलॉजी, पुणे** यांच्यासोबतच्या करारास दिनांक ०१.१२.२०२० ते ३०.११.२०२१ या एका वर्षाच्या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२९१७१७२३८५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Laxmanrao Kathole

Digitally signed by Sunil Laxmanrao Kathole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=28a37fe1ff3e4e025e695251dc7073be0c55927dfde2440021496777c190c146, serialNumber=d2cb6e9ba02dfc9c368a0dfe373a6877ad6cad79f1363d85e0435ea61d33c752, cn=Sunil Laxmanrao Kathole
Date: 2020.10.29 17:20:26 +05'30'

**( सु. ल. काठोळे )**
**कक्ष अधिकारी**
**महसूल व वन विभाग.**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. व्यवस्थापकीय संचालक, वनविकास महामंडळ, नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक (सर्व प्रादेशिक)
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग, व्यय-१०/वित्तिय सुधारणा- १ कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. कार्यासन अधिकारी फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
९. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ (निवडनस्ती).